**तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविदयालय**
**या संस्थेस मा.कै.दौलतराव जाधव निवृत्त**
**कारागृह महानिरीक्षक यांचे नाव देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

**वाचा:-१) कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,**
**पुणे यांचे पत्र संकीर्ण/२००१/डीजीजे/क-५ (७ )पुणे-१**
**दिनांक २.७.२००१**

**<u>शासन निर्णय :-</u>** तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविदयालय पुणे या संस्थेस मा.कै.दौलतराव जाधव निवृत्त कारागृह महानिरीक्षक यांचे नाव देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

उपरोक्त प्रस्तावानुसार मा.कैलासवासी दौलतराव जाधव निवृत्त कारागृह महानिरीक्षक पुणे यांची कारागृह विभागातील प्रशासकीय कारकीर्द विचारात घेऊन तसेच महाराष्ट्र प्रिझन डिपार्टमेंट पेन्शनर्स असोसिएशन पुणे यांच्या दिनांक २२.१०.२००० च्या ठरावाच्या अनुषंगाने शासनाने आता तुरुंग अधिकारी प्रशिक्षण महाविदयालय, पुणे या संस्थेस मा. कैलासवासी दौलतराव जाधव निवृत्त कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य पुणे याचे नाव देण्यात यावे असा निर्णय घेण्यात आलेला आहे.

उपरोक्त निर्णयाची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,**

**( श. य. सोनावणे )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग..**

**प्रत,**

कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे,
कारागृह उपमहानिरीक्षक,मुख्यालय, पुणे,
श्री. ना. प. जोशी ( अध्यक्ष )
महाराष्ट्र प्रिझन डिपार्टमेंट पेन्शनर्स असोसिएशन
७३/१/४ स्मृती छाया सोसायटी, भक्ती मार्ग एरंडवणे, पुणे ४११ ००४.
प्राचार्य तुरुंगाधिकारी प्रशिक्षण महाविदयालय, पुणे.